केंद्र शासन पुरस्कृत योजने अंतर्गत सेंटर ऑफ एक्सलन्सची स्थापना करण्यांत आलेल्या ७ औ.प्र.संस्था मध्ये ॲडव्हान्स मोडयुलचे प्रशिक्षण देण्याकरीता प्रत्येकी ६ प्रमाणे ४२ प्रशिक्षण अधिका-यांची पदे कंत्राटी तत्वावर निर्माण करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**

उच्च व तंत्र शिक्षण विभाग

शासन निर्णय क्र.जाबॅप्र-२०१०/(१८१ /२०१०)/व्यशि-५

मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : २४ फेब्रुवारी, २०११.

संदर्भ:- १) शासन निर्णय क्र.आयटीआय-१००४/(२४६/०४)/व्यशि-२, दि.१९ जुलै २००५.
२)शासन निर्णय क्र.आयटीआय-१००६/(५२/०६)/व्यशि-२, दि.२४ ऑगस्ट २००६,
३)शासन निर्णय क्र.आयटीआय-२००९/(४३/०९)/व्यशि-५, दि.२७ ऑक्टोबर २०१०,
४) उच्चस्तरीय सचिव समितीच्या दिनांक २१ जानेवारी २०११ रोजी झालेल्या बैठकीचे कार्यवृत्त.

**प्रस्तावना:-** केंद्र शासनाने देशातील १०० औद्योगिक प्रशिक्षण संस्था प्रतिवर्षी याप्रमाणे ५०० औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचा दर्जा उंचावून "सेंटर ऑफ एक्सलन्स" ही योजना सन २००५ पासून सुरु केली आहे. केंद्र शासन पुरस्कृत या योजने अंतर्गत राज्यातील औद्योगिक प्रशिक्षण दर्जात वाढ करुन त्यांना "सेंटर ऑफ एक्सलन्स" मध्ये रुपांतर करण्याची कार्यवाही शासनाच्या संदर्भ क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये करण्यांत आलेली आहे.

जागतिक बँक सहाय्यित व्यवसाय प्रशिक्षण सुधारणा प्रकल्पांर्गत सेंटर ऑफ एक्सलन्सची स्थापना करण्यांत आलेल्या एकूण ६३ औ.प्र.संस्थांपैकी ५ औ.प्र.संस्थांमध्ये ॲडव्हान्स मोडयुलचे प्रशिक्षण देण्याकरीता प्रत्येकी ६ प्रमाणे ३० प्रशिक्षण अधिका-यांची पदे संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक २ नुसार निर्माण करण्यांत आलेली आहेत. ५८ शासकीय औ.प्र.संस्थांकरीता ॲडव्हान्स मोडयुलचे प्रशिक्षण देण्याकरीता प्रत्येकी ६ प्रमाणे ३४८ प्रशिक्षण अधिका-यांची पदे संदर्भाधीन शासन

निर्णय क्रमांक ३ नुसार निर्माण करण्यांत आली आहेत. उर्वरीत ७ शासकीय औ.प्र.संस्थांकरीता ॲडव्हान्स मोडयुलचे प्रशिक्षण देण्याकरीता प्रत्येकी ६ प्रमाणे ४२ प्रशिक्षण अधिका-यांची पदे (गट क) निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

सदर बाब उच्चस्तर समिती समोर दिनांक २१ जानेवारी २०११ रोजीच्या बैठकीत सादर करण्यांत आली होती. उच्चस्तर सचिव समितीने मासिक रु.१५०००/- मानधनावर जागतिक बँक सहाय्यित प्रकल्प सुरु असेपर्यंतच्या कालावधीसाठी कंत्राटी तत्वावर एकूण ४२ पदे निर्माण करण्याची मान्यता दिली आहे.

**शासन निर्णयः-** उपरोक्त पार्श्वभूमीवर केंद्र शासन पुरस्कृत जागतिक बँक सहाय्यित व्यवसाय प्रशिक्षण सुधारणा प्रकल्पांर्गत सेंटर ऑफ एक्सलन्सची स्थापना करण्यांत आलेल्या ७ शासकीय औ.प्र.संस्था मध्ये ॲडव्हान्स मोडयुलचे प्रशिक्षण देण्याकरीता प्रत्येकी ६ प्रमाणे ४२ प्रशिक्षण अधिका-यांची पदे कंत्राटी तत्वावर मासिक मानधन रु.१५०००/- च्या दराने निर्माण करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यांत येत आहे. याबाबतचा संस्थानिहाय तपशील विवरणपत्र **अ** मध्ये सोबत जोडला आहे.

**<u>अटी व शर्ती</u>:-**

१) जागतिक बँक सहाय्यित व्यवसाय प्रशिक्षण सुधारणा प्रकल्पांर्गत सेंटर ऑफ एक्सलन्सची स्थापना करण्यांत आलेल्या ७ औ.प्र.संस्था मध्ये ॲडव्हान्स मोडयुलचे प्रशिक्षण देण्याकरीता प्रत्येकी ६ प्रमाणे ४२ प्रशिक्षण अधिका-यांची पदे जागतिक बँकेच्या प्रकल्प कालावधीपर्यंत कार्यरत राहतील.

२) सदर पदे मासिक रु.१५०००/- मानधन दराने कंत्राटी तत्वावर शासनाच्या विहित पध्दतीनुसार भरण्यांत यावीत. विहित केलेली आवश्यक ती शैक्षणिक अर्हता निकष व पद भरतीबाबतचे शासनाचे प्रचलित नियम व धोरणानुसार भरती करणे बंधनकारक राहील.

३) सर्व संबंधित उमेदवारांची नियुक्ती कंत्राटी तत्वावर प्रकल्पाच्या उर्वरीत कालावधी पुरती केली जावी. प्रकल्पाच्या कालावधीनंतर सदरहू कंत्राटी तत्वावरील नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल.

४) कोणत्याही परिस्थितीत संबंधित कंत्राटी उमेदवारांना शासकीय सेवेत कायम / समायोजन केले जाणार नाही व त्यांना शासकीय सेवेत सामावून घेण्याचा हक्क राहणार नाही.

५) सदरहू कंत्राटी कर्मचा-यांना शासकीय सेवकांना अनुज्ञेय असलेल्या कोणत्याही सोयी व सवलती उपलब्ध असणार नाहीत.

६) शासनाच्या धोरणानुसार रिक्त पदे कंत्राटी पध्दतीने भरताना मागासवर्गीय, महिला, अपंग इत्यादीसाठी असलेले आरक्षण पाळले जाईल याची सर्व नियुक्ती प्राधिका-यांनी दक्षता घ्यावी. आरक्षित पदांवर कंत्राटी नेमणूक दिल्यामुळे संबंधित कंत्राटी कर्मचा-यांना नियमित नियुक्तीचे हक्क राहणार नाहीत.

७) कंत्राटी पध्दतीने नियुक्त करावयाच्या उमेदवारांकडून विहित करारपत्रावर स्वाक्षरी घेण्यांत यावी. करारपत्राचा नमुना सोबत जोडला आहे. करारपत्र रु.२०/- च्या स्टॅम्प पेपरवर करण्यांत यावे.

८) पद निर्मितीसाठी होणारा खर्च जागतिक बँक सहाय्यित व्यवसाय प्रशिक्षण सुधारणा प्रकल्पांर्गत मंजूर तरतूदीमधून भागविण्यांत यावा.

हा शासन निर्णयास वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.पदनि-२०११/प्र.क्र.०५/११/ वित्तीय सुधारणा-१, दिनांक २१ जानेवारी २०११ अन्वये उच्चस्तर सचिव समितीच्या मान्यतेने निर्गमित करण्यांत येत आहे.

हा शासन निर्णय शासनाच्या संकेत स्थळावर www.maharashtra.gov.in यावर उपलब्ध असून त्याचा संगणकीय सांकेतांक क्रमांक २०११०२२४१६४३३४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(सीमा ढमढेरे)
सह सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
मा.मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव

सचिव, श्रम व रोजगार मंत्रालय, श्रमशक्ती भवन,भारत सरकार, नवी दिल्ली.
सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२.
आयुक्त, रोजगार व स्वयंरोजगार विभाग, कोकण भवन, नवी मुंबई
संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सहसंचालक/उपसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई / पुणे / नागपूर / अमरावती / औरंगाबाद / नाशिक [संचालक (प्रशिक्षण) यांचेमार्फत]
सर्व जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी [संचालक (प्रशिक्षण) यांचेमार्फत]
महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
संबंधित प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था [संचालक (प्रशिक्षण) यांचेमार्फत]
नियोजन / वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासन अधिकारी (साशि-१), उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
कार्यासन व्यशि-१,२,३,४.
निवड नस्ती/व्यशि-५

**करारपत्र**

**शासन निर्णय क्रमांक : जाबँप्र/२०१०/(१८१ /१०) /व्यशि-५,**

**दिनांक : फेब्रुवारी, २०११ चे सहपत्र.**

**शिक्षक संवर्गात कंत्राटी शिक्षक म्हणून नियुक्ती देण्यांत आलेल्या उमेदवारांकडून**
**रु. २०/- च्या स्टॅम्प पेपरवर लिहून घ्यावयाचा करारामा.**

प्रति,

----------------------------------

----------------------------------

( येथे नियुक्ती प्राधिका-यांचे पदनाम व पत्ता लिहिण्यांत यावा.)

ज्याअर्थी, (या ठिकाणी नियुक्ती प्राधिका-यांचे पदनाम लिहिण्यांत यावे) (यापुढे नियुक्ती प्राधिकारी असा उलेख केला जाईल.) यांनी त्यांच्या कार्यालयीन आदेश क्रमांक : -------------------- दिनांक----------------नुसार श्री/श्रीमती/कुमारी --------------------------राहणार --------------------(यापुढे उमेदवार म्हणून उल्लेख केला जाईल) यांची नियुक्ती पत्रात नमूद केलेल्या अटी व शर्तीवर -------------------- पदावर कंत्राटी पध्दतीने -----------या कालावधीसाठी नियुक्ती केली आहे. (यापुढे संबंधित नियुक्ती पत्र असा उल्लेख केला जाईल.)

आणि, त्या अर्थी मी श्री./श्रीमती./कुमारी ----------------------लिहून देतो/देते की : -

१) मला प्राप्त झालेल्या नियुक्ती पत्रातील सर्व अटी व शर्ती मी वाचल्या आहेत आणि त्या मला समजल्या आहेत. त्या सर्व अटी व शर्ती मला मान्य आहेत.

२) जर माझ्याकडून एखाद्या अटी / शर्तीचा भंग झाला तर ----------पदावरील माझी नियुक्ती रद्द केली जाईल, याची मला जाणीव आहे,

३) मी या संदर्भातील सर्व माहिती जाणून घेतल्यानंतर जाणीवपूर्वक व स्वेच्छेने सदर कंत्राटी नियुक्ती स्वीकारीत आहे,

४) या कंत्राटी नियुक्तीनंतर मला कायम स्वरुपी नियुक्ती मिळण्याचा हक्क राहणार नाही, तसेच या करारपत्राच्या कालावधीनंतर शासनावर कोणतीही जबाबदारी राहणार नाही व या कंत्राटी सेवेशी निगडित कोणत्याही प्रकारची मागणी मी करणार ाही, अशी या करारपत्राव्दारे हमी देत आहे.

५) माझे कामकाज असमाधाकारक आढळून आल्यास माझी नियुक्ती तात्काळ रद्द करण्यांत येईल, याबाबत माझी कुठलीही तक्रार राहणार नाही.

श्री/श्रीमती/कुमारी---------------------------------

स्वाक्षरी :

दिनांक :

समक्ष -

१)

२)

( नियुक्ती प्राधिका-यांचे पदनाम) यांच्यासाठी आणि यांच्या वतीने

--------------------------

(नियुक्ती प्राधिका-यांने प्राधिकृत केलेल्या अधिका-यांचे नांव आणि पत्ता)

**शासन निर्णय क्रमांक : जाबँप्र/२०१०/(१८१ /१०) /व्यशि-५,**
**दिनांक :२४ फेब्रुवारी, २०११ चे सहपत्र.**

## विवरणपत्र-"अ"

जागतिक बँक सहाय्यित व्यवसाय प्रशिक्षण सुधारणा प्रकल्पांतर्गत सेंटर ऑफ एक्सलन्सची स्थापना करण्यांत आलेल्या ७ शासकीय औ.प्र.संस्थांमधील कंत्राटी तत्वावरील ४२ प्रशिक्षण अधिकारी पदांचा तपशिल.

| अ.क्र. | जिल्हा | औ.प्र.संस्थेचे नांव व पत्ता | पदनाम | पदांची संख्या | मानधन रु. |
|---|---|---|---|---|---|
| १ | ठाणे | वाडा, | प्रशिक्षण अधिकारी | ६ | १५,०००/- |
| २ | लातूर | निलंगा | प्रशिक्षण अधिकारी | ६ | १५,०००/ |
| ३ | अमरावती | चांदूर रेल्वे | प्रशिक्षण अधिकारी | ६ | १५,०००/ |
| ४ | नागपूर | रामटेक | प्रशिक्षण अधिकारी | ६ | १५,०००/ |
| ५ | नागपूर | काटोल | प्रशिक्षण अधिकारी | ६ | १५,०००/ |
| ६ | चंद्रपूर | चंद्रपूर (मु.) | प्रशिक्षण अधिकारी | ६ | १५,०००/ |
| ७ | धुळे | पिंपळनेर | प्रशिक्षण अधिकारी | ६ | १५,०००/ |